लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत असलेल्या विविध कामांकरिता सन २०२४-२५ मधील निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-तीक्षेवि- २०२४/प्र.क्र.५२/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २० फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :** १) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२२/प्र.क्र.८४/फ-९, दि.२७.०७.२०२२

२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.५२/का.१४४४-अ, दि.२७.०५.२०२४

३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.

४) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.४८/का.१४४४-अ, दि.३०.०९.२०२४

५) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.तीक्षेवि-२०२४/प्र.क्र.५२/का.१४४४-अ, दि.०४.१०.२०२४

**प्रस्तावना :**

वाचा क्र.१ येथील शासन निर्णयान्वये “लोणार सरोवर विकास आराखडयातील” रु.३६९.७८७७ कोटीच्या कामांना मंजुरी देण्यात आली आहे. वाचा क्र.२ अन्वये सन २०२४-२५ मध्ये रु.४.७५ कोटी इतका निधी सदर आराखडयास वितरित करण्यात आला आहे. वाचा क्र.४ अन्वये रु.४३४.६१७७ कोटी इतक्या रकमेच्या लोणार सरोवर विकास आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. वाचा क्र.५ अन्वये सन २०२४-२५ मध्ये रु.१८.६८ कोटी इतका निधी सदर आराखडयास वितरित करण्यात आला आहे. लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत विविध कामांकरीता मागणी क्र.ओ-१० “५४५२ ०१८७ - ५३ मोठी बांधकामे” अंतर्गत सन २०२४-२५ करीता रु.३९.०५ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित केला आहे. आता विभागीय आयुक्त, अमरावती यांनी “लोणार सरोवर विकास आराखड्यांतर्गत” सन २०२४-२५ मधील कामांकरिता रु.४०.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. तथापि, अर्थसंकल्पित निधीच्या १००% प्रमाणात म्हणजेच उर्वरित रुपये १५.६२ कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

लोणार सरोवर विकास आराखडयाअंतर्गत समाविष्ट असलेल्या विविध कामांकरिता सन २०२४-२५ साठी रु.१५.६२ कोटी इतका निधी (रुपये पंधरा कोटी बासष्ट लाख फक्त) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.कोटी)

| अ. क्र. | लेखाशीर्ष व उद्दीष्ट | सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पित निधी | यापूर्वी सन २०२४-२५ मध्ये वितरीत निधी | विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती यांना प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| १. | ५४५२ ०१८७ ५३-मोठी बांधकामे | ३९.०५ | २३.४३ | १५.६२ |

२. सदरहू खर्च "लेखाशिर्ष मागणी क्र. ओ-१०, मुख्य लेखाशिर्ष ५४५२- पर्यटनावरील भांडवली खर्च ,०१, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा,१०१-पर्यटन केंद्रे (००) (१२) लोणार सरोवर विकास आराखडा (कार्यक्रम) (५४५२ ०१८७) ५३-मोठी बांधकामे" या उद्दिष्टाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदर प्रयोजनासाठी झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्याची कार्यवाही विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी करावी. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४४/२०२५/व्यय-८, दिनांक २४.०१.२०२५ अन्वये प्रदान केलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२२०१२१०३०८४१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2025.02.20 12:12:02 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त,अमरावती विभाग, अमरावती.

२) जिल्हाधिकारी, बुलढाणा.

**प्रत,**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

३) प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

५) मुख्य अधिकारी, लोणार नगर परिषद, जि.बुलढाणा.

६) जिल्हा नियोजन अधिकारी, बुलढाणा.

७) जिल्हा कोषागार अधिकारी, बुलढाणा.

८) कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) कार्यासन (व्यय-८,अर्थ-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवड नस्ती (का.१४४४-अ), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.